Vol. 3 | 1st May, 2019 (Monthly) | **Price:** ₹100/- | **Total Pages:** 36

1 to 8 Years

# चिकूPiku

Fun & Learning

मुलं वाचायला
शिकण्याआधीचं
Magazine

For Kids & Parents

Brain-based Nurturing for Early Childhood.
Stories & Activities in मराठी & English Languages.

# मुलांच्या मेंदूत डोकावूयात!

माणसांत एकूण ८ प्रकारच्या बुद्धिमत्ता असतात. प्रत्येकात या आठ बुद्धिमत्ता कमी-अधिक प्रमाणात असतात. आठपैकी किमान दोन ते तीन बुद्धिमत्ता प्राधान्याने असतात. चिकू पिकू मासिकातील प्रत्येक गोष्ट / Activity मुलांना खाली दिलेल्या बुद्धिमत्तांविषयीचे अनुभव देईल. आपल्या मुलांमध्ये कोणती बुद्धिमत्ता आहे हे आपण सततच्या निरीक्षणातून शोधू शकतो.




**1. Linguistic / Verbal Intelligence**

Narrating & Reading Stories



**2. Spatial Intelligence**

Art & Drawing Activities



**3. Interpersonal Intelligence**

Giving Opportunities to Express Thoughts



**4. Musical Intelligence**

Listening & Singing Poems





**5. Intra-personal Intelligence**

Motivating Kids to Think & Explore World



**6. Bodily-kinesthetic Intelligence**

Enacting Poems and Stories



**7. Logical-Mathematical Intelligence**

Activities to Support Math & Logical Reasoning



**8. Naturalistic Intelligence**

Activities to Develop Sensitivity Towards Nature


Chiku Piku team of experts: **Dr. Shruti Panse** (Educationist) | **Abha Bhagwat** (Artist- Wall art painting) **Dharmaraj Patil** (Ornithologist) | An enthusiastic team of illustrators & artists

**Owned & Published by** OneZeroEight Learning Pvt. Ltd. | **Editor**: Dr. Shruti Panse

**Printed by** Atharva Print Creation, S. No. 91/1, Plot No. 8, Tulshibaugwale Colony, Sahakar Nagar, Pune 411 009

**Published at** Flat No. 10, Narayan Complex, 2nd Floor, Hingne Kh., Sinhgad Road, Pune 411 051





तुमच्या मुलांना कसे आई-बाबा आवडत असतील?

- खूप पैसे असलेले?
- खूप काम करणारे?
- आनंदी?
- त्यांच्याशी खेळणारे?
- मोबाईल-लॅपटॉपमध्ये बघणारे?
- बागेत फिरायला घेऊन जाणारे?
- धपाटे घालणारे?
- त्यांना चॉकलेट घेऊन देणारे?
- मांडीवर घेऊन गोष्ट सांगणारे?
- मॉलमध्ये फिरायला नेणारे?
- घरातले कांदे-बटाटे,वाट्या-चमचे, कपडे इकडे-तिकडे पसरवू देणारे?
- भिंतीवर हवं तसं रेघोट्या ओढू देणारे?





कसे?

तुम्हीच ठरवा तुमच्या बालपणात डोकावून
किंवा पिल्लाच्या डोळ्यात बघून!

डॉ. श्रुती पानसे

Editor - Chiku Piku

Ph.D. (Brain-based Learning)

**Educationist | Consultant | Child Psychologist**

**www.shrutipanse.com**



Linguistic/Verbal intelligence

चिकू पिकूच्या घराजवळ एक कोंबडी राहते. सगळेजण तिला कोंबडूबाई म्हणतात. एकदा कोंबडूबाई अंड्यांना ऊब देत, वाळलेल्या गवताच्या पेंढ्यावर बसलेली असते. तेवढ्यात पिकू तिथे येते.






काय कोंबडूबाई, किती अंडी घातलीस? आणि कधी बाहेर येणार गं पिल्लं?

पाच अंडी आहेत. बहुतेक येतीलच थोड्या वेळात. पिकू, पिल्लं बाहेर आल्यावर त्यांना लगेच खायला द्यायला लागेल गं. तू थोडा वेळ इथे बसून माझ्या अंड्यांची राखण करशील का? मी लगेच खाऊ घेऊन येते.



थांबते की. पण तू लगेच ये हं!



कोंबडूबाई अंड्यांना गवताने झाकते आणि पिल्लांसाठी खाऊ आणायला निघून जाते आणि पिकू जवळच्या फांदीवर बसून अंड्यांकडे बघत बसते. थोड्या वेळाने पिकूला डुलकी येते, आणि ती झोपते. तितक्यात चिकू तिथे येतो. उन्हामुळे चिकूलापण झोप येत असते. तो गवताच्या पेंढ्याजवळच झोपी जातो.

थोड्या वेळाने कसल्यातरी आवाजाने चिकूला जाग येते. तो डोळे उघडतो तर त्याच्या अवती-भोवती कोंबडीची खूप लहान-लहान पिल्लं असतात. एक तर त्याच्या पाठीवर बसलेलं असतं. एक त्याची शेपूट ओढत असतं आणि एक डोक्यावर बसून चोच त्याला मारत असतं.

पिल्लांना वाटतं चिकू म्हणजेच त्यांची आई आहे.
ती ओरडत असतात. आईSSS, आईSSS भूक लागली.




चिकू पळायला लागतो. पिल्लंसुद्धा त्याच्या मागे पळायला लागतात.

Audio story available on www.chikupiku/audio

पिकू एकदम जागी होते. चिकूच्या मागे-मागे पळणाऱ्या पिल्लांना पाहून ती जोरजोरात हसायला लागते.





अगं, हसतेस काय? मदत कर मला.

तेवढ्यात कोंबडूबाई पिल्लांसाठी दाणे घेऊन येते. पिकू पिल्लांना म्हणते, 'अरे पिल्लांनो, ती बघा तुमची आई. हा तर चिकू आहे.' कोंबडूबाई आणि पिकू हसायला लागतात. कोंबडूबाई पिल्लांना जवळ घेते आणि दाणे भरवते.

बापरे. मला वाटलं ही पिल्लं आता मला काही सोडणार नाहीत.

हा हा. चिकू, तू तर आज आईच झाला होतास.

**Parents Zone**

मुलांना चित्रांचा वापर करून गोष्ट सांगा. Audio story चा वापरसुद्धा करता येईल. ऐकलेली गोष्ट मुलांना स्वतः सांगू द्या, पण सक्ती न करता.



Paper




Bottle



Pencil



Cap



Flower



Colours





**Bittu wants to make a birthday card for his friend. Tick the objects that he needs to make the greeting card.**

This is a surface of a blank greeting card.
Design this greeting card for your friend!





**Visual/Spatial Intelligence**




## कोंबडीचं पिल्लू

कोंबडीच्या अंड्यामधून बाहेर आले पिल्लू,
अगदी होते छोटे आणि उंचीलाही टिल्लू.
कोंबडीचं पिल्लू आईला शोधतं,
‘आई, आई’, करुन चुकून भलतीकडेच जातं.

**(कवितेच जग मुलांना आवडतं.
त्यांच्याबरोबर ठेक्यात कविता म्हणा.)**

या चित्रात O दिसतायेत का? दिसत असेल तर बोटाने दाखव.

हे बघ O पासून काढलेलं घुबड. तू पण O पासून एखादं चित्र काढून बघ!



# Curious CUBO


Audio story available on www.chikupiku/audio

Cubo's father took him to a swimming pool. Cubo has recently learnt swimming. While he was trying the underwater stroke, suddenly water gushed in his nose. He quickly came upside.


Linguistic / Verbal intelligence

Be careful Cubo.

Baba, why can't I breathe under water?

Cubo, when we breathe we inhale oxygen from air. Humans cannot absorb oxygen from water.

**Parents Zone**

मुलांच्या कोणत्याही प्रश्नाला टाळू नका. हसूही नका. शक्यतो उत्तर देण्याचा प्रयत्न करा.


Then how do fish breathe in water? Don't they need oxygen?


Of course! they do. Fish breathe through their gills.




**Gills?**
What are gills?

Gill is a respiratory organ, by which fish absorb oxygen from water.

So, don't I have gills?

No Cubo, humans don't have gills.

Humans have nose for breathing on land & Fish have gills for breathing in water.

# SINK OR FLOAT



प्रयोग करुन पहा.

यातल्या कोणत्या वस्तू तरंगतील बरं?
(बादलीत पाणी घेऊन
या वस्तू पाण्यात टाकून बघा)
तरंगणाऱ्या वस्तूंना ✓ करा

**Parents Zone**

हा प्रयोग मुलांबरोबर करून बघा
















MY NUMBER PAGE

Logical-Mathematical Intelligence

## Colour only 7 balloons out of 10





## Find & circle the number 7

1 7 5 3 9
2 8 9 7 2 4
3 5 4 8
4 7 3 7 1 4 7
1 4 9 2 9
7 8 5 7 2
3 4 3 8 4
2 3 7 1 5
4 7 5 1 9 4 8 7

## Spell it out!

7

e n v e s

..............................................................................

**Parents Zone**

Show the number, ask him/her to point out 7 and you have to circle them.



# I see a triangle

Can you see triangles in below images?



Visual/Spatial, Logical-Mathematical Intelligence

Trace & colour it.







Now write down the objects where you can see a triangle.

**Parents Zone**

This activity helps children to identify particular shape.

........................................................................................................

# Rhyme time

Say these words loudly.
Do they rhyme? If yes, tick ✓



















# Nature and मी

Dharmaraj Patil
(Ornithologist Wildlife Researcher)

हत्ती त्याचे कान
सतत हलवतो. का बरं?



तुझे कान
हलतात का?



आपल्याला जसं तापमान वाढल्यावर उकडतं, तसं हत्तीलासुध्दा उकडतं. हत्ती कान पंख्यासारखे हलवून कानाच्या आतून जाणारे रक्त थंड करतो. तेच रक्त हत्तीच्या शरीरालाही थंड ठेवतं.

## या घुबडाचे कान कुठे आहेत?

खरंतर तुम्हाला जे कान वाटत आहेत ती फक्त पिसं आहेत. घुबडाचे कान आत असतात. पिसांना धडकून ध्वनी लहरी कानापर्यंत पोहोचवल्या जातात.





Naturalistic Intelligence

# अजून कोणत्या प्राण्यांना पाय नसतात बरं?

Complete the series of numbers

1

3

5

7

हॅलो,
मला पाय नसतात तसे कानही नसतात. जमिनीवरुन येणाऱ्या कंपनांवरुन (Vibrations) मी गोष्टीचा अंदाज घेतो.

मलासुद्धा कान नसतात. पाण्यामधल्या कंपनांवरुन मी पाण्यातल्या गोष्टींचा अंदाज घेतो.



Naturalistic Intelligence

# फिशिरा



Audio story available on www.chikupiku/audio

फिशिरा त्याच्या मित्रांबरोबर खेळत असतो तेव्हा अचानक एक वेगळाच प्राणी त्यांना दिसतो. हा प्राणी स्वतःभोवती गरागरा फिरत असतो. फिशिरा आणि त्याचे सगळे मित्र त्या प्राण्याचं खूप वेगवेगळ्या बाजूंनी निरीक्षण करत असतात.

ए... तू कोण आहेस रे? कुठे चालला आहेस? बोल ना आमच्याशी!

तुझं तोंड कुठंय रे? समजतच नाहीये!

नक्की कुठे जायचंय तुला? असं गरागरा फिरून कुठे जायचंय हे कसं कळतं तुला?

बाबा, बघ ना कोण आहे हा?
आमच्याशी बोलतच नाहीये.
खेळत पण नाहीये तो.
सांग ना त्याला.





बघू कोण आहे? अच्छा... हा स्वतःभोवती फिरणारा समुद्री प्राणी आहे. घाबरतोय तुम्हाला, म्हणून तर तो तुमच्यापासून लांब पळून जातोय... त्याच्या मागे लागू नका. तुमच्याशी नीट ओळख झाली की येईल तो खेळायला.

घाबरून कपारीखाली लपून बसलेला हा प्राणी बाबाला दिसतो. तो जातो आणि त्याच्याशी बोलतो.

अरे मित्रा,
घाबरू नकोस.
ये बाहेर.

(तरीपण तो बाहेर येत नाही.)
फिशिरा, त्याला वाटलं तर तो येईल,
तोपर्यंत तुम्ही एकमेकांशी खेळा.
त्याला त्रास देऊ नका.

फिशिरा आणि त्याचे मित्रं लपाछपी खेळायला लागतात.
त्यांची धमाल बघून हा प्राणी हळूच बाहेर येतो.







मी पण येऊ खेळायला?

ये की...!
तुझं नाव काय?

स्पाईनी...!

**Parents Zone**

This story would help you to make kids understand the importance of understanding and being flexible with others.

स्पाईनीसुद्धा फिशिरा व त्याच्या मित्रांबरोबर सामील होतो.

# ठिपके जोडून चित्र काढ!



Visual / Spatial, Logical-Mathematical Intelligence

# Trace & Color



हे चित्र आम्हाला
Whatsapp वर पाठवा.
91721 36478

# उंदीरमामांचा मोबाईल



Musical & Kinesthetic Intelligence

**Parents Zone**

कवितेची प्रत्येक ओळ **enact** करून म्हणा.



कोपऱ्यात एक मोबाईल दिसला,
उंदीरमामांच्या नजरेस पडला.



पटकन उचलला हातामध्ये
लपून ठेवला खिशामध्ये



हळूच पाहिले सगळीकडे,
घेऊन निघाले बिळाकडे



इतक्यात गाण्याची वाजली धून,
टाकून स्वारीने ठोकली धूम

- जयश्री एडगांवकर

उंदीरमामांना मोबाईलपर्यंतचा रस्ता शोधून दे बरं!







Tanu is going to a beach. He is going to carry some object on the beach. Can you match the objects with the given shadows?





Visual / Spatial, Logical-Mathematical Intelligence

# हे चित्र पूर्ण कर आणि रंगव.



हे चित्र आम्हाला Whatsapp वर पाठवा.
91721 36478

# वरद, आई आणि बर्फाचा गोळा



 ला बर्फाचा गोळा खूप आवडतो.

एके दिवशी ने साठी कालाखट्टा विकत घेतला.

 खुश झाला. च्या एक दोन चुरस्क्या चाखल्यावर

 चा गोळा खाली पडला. ने खाली पडलेला

गोळा उचलला. म्हणाली, खाली पडलेला गोळा

खाऊ नकोस बाळा. ला धूळ आणि जंतू चिकटलेले असतील.

 नी आईचं ऐकलं. म्हणाली,

Good Boy. दुसऱ्या दिवशी नं, वरदच्या आवडीचं

Ice-cream तयार केलं. म्हणाला Thank You !



Visual/Spatial Intelligence

**Parents Zone**

वर दिलेल्या चित्रांची नावं मुलांना दाखवा आणि लक्षात ठेवायला सांगा. गोष्ट तुम्हालाच मोठ्यांदा वाचून सांगायची आहे. पण प्रत्येक वेळेस जेव्हा चित्र येईल तेव्हा त्याचं नाव काय ते मुलांना सांगू दे.



# चिमणी चित्र



 Visual/Spatial Intelligence



## आवर्जून काय कराल

बाजारात मिळणाऱ्या रंगांचे स्पर्श, पोत, गंध, चव, आकार, किंमत यांचा एकसुरीपणा आणि घरी तयार केलेल्या नैसर्गिक रंगांचं वैविध्य लक्षात घ्या आणि मुलांनाही सांगा.



## काय करू नका

मुलांना स्वतःच्या हाताने प्रयोग करून अनुभव घेता यावा म्हणून पालकांनी आपणच सर्व रंग तयार करू नयेत. मुलांना स्वतःच्या हाताने प्रयोग करून अनुभव घेता यावा म्हणून त्यांना स्वतः सर्व कृती करू द्यावी.



## पालकांसाठी

आज शहरी माणूस पूर्णपणे बाजारावर अवलंबून आहे. रंग आणि चित्रकलेची साधनं निसर्गातूनच मिळतात याचा विसरही पडलेला आहे आणि त्यामुळेच केवळ एखाद्या कंपनीने तयार केलेल्या रंगांच्या वापराशिवाय चित्र तयार होऊच शकत नाही असा विश्वास आपल्याला वाटतो. यातून मुलांची सुटका करणं, त्यांना नैसर्गिक रंग तयार करण्याचे मार्ग दाखवणं, हे घडायला हवं.

भाज्या, धान्य, माती यांचा स्पर्शही आज लहानपणापासून होत नाही आणि त्यातील जैवरासायनिक अभिक्रियांचे आपल्या त्वचेला अनेक फायदे असतात. रासायनिक प्रिझर्व्हेटिव्ह घातलेले बाजारातील रंग मात्र त्वचेसाठी घातक ठरतात.

**छोट्या मुलांना** रंग तयार कसा होतो? त्याचा पोत, गंध, स्पर्श कसा असतो? त्याची चव घेता येऊ शकते का? तो ओला असताना आणि वाळल्यावर रंगछटेत काही फरक पडतो का? अशा नैसर्गिक रंगांतून कशा प्रकारची चित्रं निर्मिती करता येईल? हे प्रश्न पडावेत आणि उत्तरं शोधायची संधी मिळावी. कला निर्मिती करताना पर्यावरणीय नुकसान कमीत कमी करता येईल का? हाही विचार मुलांच्या मनात रुजावा यासाठी एवढी सुरुवात नक्कीच करता येईल.












# मुलांसोबत ही Activity करून पहा!

**साहित्य** - कोरे कागद, हळद पूड, बीट, पालक, माती, पाणी. प्रत्येक रंगासाठी एक स्वतंत्र भांडं.

**काय करायचं** - घरात असलेली हळदीची पूड, एखादं बीट आणि पालकाची १२ पानं घे. थोडीशी हळद एका भांड्यात घेऊन त्यात पाणी घालून पिवळा रंग बनव. दुसऱ्या भांड्यात बीट किसणीने किसून ते पिळून त्याचा रंग काढ. तिसऱ्या भांड्यात पालकाची पानं आणि देठं कुस्करून त्याचा हिरवा रंग तयार कर. या रंगांपासून चित्रं काढून पहा. हे रंग एकमेकांत मिसळून कुठले रंग मिळतात असाही प्रयोग कर.






# आकार शोध आणि रंगव.





Visual/Spatial Intelligence

या सिंहाला एखादं मस्त नाव सुचव

........................

**Parents Zone**

मुलांना नाव सुचवायला सांगा आणि तुम्ही लिहा. मुलांच्या Imagination ला वाव द्या.

# Let's Count







How many legs do 3 dogs have?



Hi, I am Moti.



I am a street dog. One day some naughty children tied firecrackers to my tail. I got very frightened. A little girl, Leena helped me. She threw some water on the firecrackers and took it off from my tail. She became a good friend of mine. Would you like to be my friend?

If yes colour this square.




Emotional Intelligence

छबीच्या शाळेला सुट्ट्या लागल्या होत्या. ती दिवसभर मित्र-मैत्रिणींबरोबर खेळायची, भरपूर चित्रं काढायची, आजीबरोबर बागेत फिरायली जायची. बागुलबुवाबरोबर गप्पा मारायची आणि आईला कधी-कधी घरातल्या कामात मदतही करायची.



एकदा रात्री जेवण झाल्यावर छबी चित्र रंगवत बसली होती.



तितक्यात दिवे गेले आणि सगळीकडे अंधार झाला.

आईऽऽऽ आजीऽऽऽ
कोणीतरी या इकडे पटकन.
सगळीकडे अंधार झालाय.

अगं छबुकली लगेच काय
घाबरतेस! अंधारच तर झालाय.

दुसऱ्या दिवशी छबी बागुलबुवाला भेटते तेव्हा ती रात्री दिवे गेल्यावर किती घाबरलेली ते सांगते आणि त्याला विचारते...

बागुलबुवा, तुला अंधाराची भीती नाही वाटत का रे?

नाही गं, उलट मला अंधार खूप आवडतो. अंधारात किती गमती-जमती असतात बघायच्या आहेत का तुला?

होऽऽऽ

चल, मग जादूच्या पिशवीत जाऊन बघुयात.
(बागुलबुवानी जादूचा मंत्र म्हटला)

चिंग चिंग चू, चिंग चिंग चू,
जादूच्या दुनियेत ने आम्हाला तू!



Audio story available on www.chikupiku/audio

**छबी आणि बागुलबुवा जादूच्या पिशवीतल्या सुंदर दुनियेत जातात. तिथे बागुलबुवा छबीला अंधारातल्या गमती-जमती दाखवतो.**

हे बघ छबी,अंधारात तारे किती छान दिसतात.
हे सप्तर्षी बघ. सप्तर्षी म्हणजे सात तारे.
ते नेहमी एकत्र असतात.

आणि ते काजवे दिसले का?
काजवे म्हणजे चमकणारे किडे.

घुबडाला तर अंधारात
सगळंच दिसतं, त्याचे डोळे
खूप Strong असतात ना!



वॉव! किती मस्त
आहे हे सगळं.

पिशवीतून बाहेर आल्यावर बागुलबुवा छबीला विचारतो.




## तुला दिसणाऱ्या अंधारातल्या गमती-जमती इथे काढ!

**चित्र आम्हाला Whatsapp वर पाठवा.**
**91721 36478**

# SPOT SPOT

**Saurabh and Siddhi have gone on a camping trip.**
**They have got many objects for the trip.**
**Can you spot the given objects from this picture?**

| | |
|---|---|
| 1) Racket | 8) Bon Fire |
| 2) Cat | 9) Spoon |
| 3) Sandwich | 10) Sunglasses |
| 4) Bag | 11) Juice |
| 5) Football | 12) Guitar |
| 6) Butterfly | 13) Bird |
| 7) Water-bottle | 14) Flower |



# My Corner



Anisha Patwardhan
Pawar Public School,
Nanded City, Pune.

Anisha is 7 years old. She likes to read and draw. She writes her own stories based on the incidences and experiences she gets. Given below is the story written by Anisha. She wrote it after her visit to a picnic spot called 'Morachi Chincholi'.

In Chincholi, Neha was so much happy to see peacocks. She always wanted to see peacocks. When she walked near and near she saw many feathers of peacocks. She was so happy to see them. Then she went home and drew a peacock beautifully. She also pasted the feathers on the picture. Next day, when she went school: teacher said, "Let me check what you have done" Teacher liked Neha's picture of peacock.
She gave her ten-eleven stars and two smileys. Neha was very happy. When the school was over she went home and showed the picture to her mom. Her mom was also very happy. She patted Neha and gave her a colouring book as a gift.





1st May, 2019 (Monthly) | Price: ₹100/-
RNI TC No. MAHBIL10083

# MIRROR IMAGES

ही अक्षरे अशी का दिसत आहेत?
हे पान आरशात बघ.
आता वाचता येतय का नीट?

क



To Buy online, logon to **www.chikupiku.com** | **91721 36478**